**श्रीम. एस. बी. चव्हाण यांच्या पदोन्नती आदेशामधील पदस्थापनेमध्ये अंशत: बदल करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांकः न्यायाप्र-२०१६/प्र.क्र.३५२/का.१५**
मंत्रालय विस्तार, मुंबई-३२.
तारीख: १० नोव्हेंबर, २०१६.

वाचा :-

१) आदिवासी विकास विभाग ,शासन आदेश क्र. आस्था २०१६/प्र.क्र.१२६/का.१५, दि.०३/१०/२०१६.

२) मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर यांचा आदेश दि.२७/०९/२०१६.

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र आदिवासी विकास सेवेतील सहायक प्रकल्प अधिकारी / संशोधन अधिकारी व तत्सम गट- ब संवर्गामधील अधिकाऱ्यांना सहायक आयुक्त / वरिष्ठ संशोधन अधिकारी / प्रकल्प अधिकारी (श्रेणी-२) गट- अ या संवर्गात (वेतन संरचना रुपये १५६००-३९१००+ ग्रेड पे- ५४००) या संदर्भाधिन आदेश क्र. १ अन्वये तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नतीने नियुक्ती देण्यात आलेली आहे. सदर आदेशान्वये श्रीम. एस. बी. चव्हाण यांना पदोन्नती देऊन त्यांची पदस्थापना वरिष्ठ संशोधन अधिकारी ,अनुसुचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती,नंदुरबार येथे करण्यात आलेली आहे.

२. तथापि, श्रीम. एस. बी. चव्हाण यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण खंडपीठ, नागपूर येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र. ६७६/२०१६ प्रकरणी मा. न्यायाधिकरणाने दि.२७/०९/२०१६ रोजी आदेश पारित केले आहेत. सदर आदेशास अनुसरुन श्रीम. चव्हाण यांनी दि.२७/१०/२०१६ च्या पत्रान्वये निवेदन शासनास सादर केले असून सदर निवेदनामध्ये त्या विधवा स्त्री अधिकारी असल्याने शासन अधिसूचना दि.२८/०४/२०१५ मधील नियम ७ (IV) अन्वये नागपूर किंवा अमरावती महसुली विभागात पदोन्नतीने पदस्थापना देण्याबाबत विनंती केली आहे.

३. मा. न्यायाधिकरणाने दि.२७/०९/२०१६ रोजी दिलेल्या आदेशानुसार व श्रीम. चव्हाण यांनी केलेल्या विनंतीस अनुसरुन प्रशासकीय कारणास्तव व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने श्रीम.एस.बी.चव्हाण यांची पदस्थापना वरिष्ठ संशोधन अधिकारी, अनुसुचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, अमरावती या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

४. श्रीम. एस.बी. चव्हाण यांनी पदस्थापना देण्यात आलेल्या ठिकाणी त्वरीत रुजू व्हावे व नवीन पदाचा पदभार स्विकारल्यानंतर त्याचा अहवाल आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

५. श्रीम. एस. बी. चव्हाण यांच्या पदोन्नतीबाबतच्या अटी व शर्ती शासन आदेश क्र. आस्था-२०१६ / प्र.क्र.१२६/का.१५, दि.०३/१०/२०१६ मध्ये नमूद केल्याप्रमाणेच कायम राहतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११०१७०११७४८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prabhakar Bapurao Gawade

Digitally signed by Prabhakar Bapurao Gawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prabhakar Bapurao Gawade
Date: 2016.11.10 17:03:08 +05'30'

**( प्रभाकर बा.गावडे )**
**उप सचिव**

**प्रत,**

१. मा.मंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ठाणे/अमरावती/नागपूर,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२, नागपूर,
७. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती / चंद्रपूर.
९. सर्व सहआयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती,
१०.संबंधित अधिकारी,
११.निवड नस्ती (का.१५).